**केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार तिलापिया मत्स्य संवर्धनासाठी राज्यस्तरीय समितीची स्थापना करण्यास मान्यता देणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र.मत्स्यवि २०१६/प्र.क्र.१२४/पदुम-१३**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२
दिनांक : १९/११/२०१६.

**वाचा:-**

१) केंद्र शासनाचे क्र.३५०४५/२०/२००३/Fy(T&E)/Trade, दि.१५.१२.२०११ चे पत्र
२) आयुक्त, मत्स्यव्यवसाय कार्यालयाचे क्र.मत्स्य/भू/०२१७०२/१७/२०१६, दि.०७.०७.२०१६ चे पत्र

**प्रस्तावना:-**

भूजल क्षेत्रामध्ये तिलापिया जातीच्या माशांच्या जातीचे मत्स्यसंवर्धन आर्थिक दृष्ट्या फायदेशीर ठरत असल्याने तिलापिया जातीच्या माशांचे संवर्धन करण्याकरीता आयुक्त, मत्स्यव्यवसाय कार्यालयाकडे विनंती अर्ज प्राप्त होत आहेत. तिलापिया जातीच्या माशांच्या प्रजातीचे संवर्धन पिंजरा पद्धतीने अथवा मत्स्यतळ्यांमध्ये करण्याकरीता केंद्र शासनाने दि. १५.१२.२०११ अन्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत.

सदर मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यस्तरीय समितीची स्थापना करण्यासाठी आयुक्त, मत्स्यव्यवसाय कार्यालयाने त्यांच्या उपरोक्त दि.०७.०७.२०१६ च्या पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने तिलापिया मत्स्यसंवर्धनासाठी राज्यस्तरीय समिती स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाच्या दि.१५.१२.२०११ च्या मार्गदर्शक सूचनांनुसार भूजल क्षेत्रामध्ये तिलापिया या माशांच्या जातीचे संवर्धन करण्यासाठी पुढीलप्रमाणे राज्यस्तरीय समिती स्थापन करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अनु.क्र. | पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २ | सहसचिव (मत्स्य), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | सहआयुक्त, मत्स्यव्यवसाय (भूजल), मत्स्यव्यवसाय विभाग, मुंबई | सदस्य |
| ४ | संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय | सदस्य |
| ५ | वरिष्ठ वैज्ञानिक, सी.आय.एफ.ई., वर्सोवा | सदस्य |
| ६ | सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय (मत्स्यबीज), मुंबई | सदस्य सचिव |

उपरोक्त समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील.

१) उपरोक्त समिती तिलापिया मत्स्यसंवर्धनासाठी प्राप्त अर्ज केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे तपासणी करेल.

२) तसेच राज्यात निर्माण झालेल्या मत्स्यसंवर्धन प्रकल्प, केज कल्चर यावर तांत्रिक देखरेख करेल.

३) भूजल क्षेत्रामध्ये तिलापिया जातीच्या माशांचे मत्स्यसंवर्धन करण्याकरीता सदर समिती तांत्रिक मार्गदर्शन व सल्ला देण्याचे काम करेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१११९१७१०४३३५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chitrakala Suryawanshi

Digitally signed by Chitrakala Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b61aaca1243458a7300585877d01b18c73211c3f79c97f57bd06e1e79a2a57ae, cn=Chitrakala Suryawanshi
Date: 2016.11.19 17:13:14 +05'30'

**(चि.नि.सुर्यवंशी)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (पदुम), मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.राज्यमंत्री (पदुम), मंत्रालय, मुंबई-३२.
३. प्रधान सचिव (पदुम), मंत्रालय, मुंबई-३२.
४. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सह सचिव (मत्स्य), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. सर्व प्रादेशिक उप आयुक्त, मत्स्यव्यवसाय.
७. सर्व सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय.
८. सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय (मत्स्यबीज), मुंबई.
९. वरिष्ठ वैज्ञानिक, सी.आय.एफ.ई., वर्सोवा, मुंबई.
१०. निवडनस्ती.